**मराठी भाषा विकासाच्या अनुषंगाने मराठी भाषेच्या प्रचार व प्रसारासाठी हाती घ्यावयाचे उपक्रम या मुख्य लेखाशीर्षांतर्गत (२०५२) नवीन उद्दिष्टांचा समावेश करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः मभापं-२०१५/प्र.क्र.१४१/भाषा-२

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ जून, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः मराठी भाषा विभाग, मभापं-२०१५/प्र.क्र.७०/भाषा-२, दि.२२ जुलै, २०१५.
२) शासन निर्णय क्रमांकः मराठी भाषा विभाग, मभापं-२०१५/प्र.क्र.१४१/भाषा-२, दि.१६ जानेवारी, २०१६

**प्रस्तावना :-**

मराठी भाषेचे संवर्धन होण्यासाठी राज्यामध्ये प्रतिवर्षी १ ते १५ जानेवारी हा कालावधी “मराठी भाषा संवर्धन पंधरवडा” म्हणून साजरा करण्यात येत. तसेच, दि. २७ फेब्रुवारी रोजी मराठी भाषा गौरव दिन आणि १५ ऑक्टोबर रोजी वाचन प्रेरणा दिन साजरा करण्यात येतो. सदर कालावधीत मराठी भाषेशी संबंधीत विषयावर परिसंवाद, कार्यशाळा, तज्ञ व्यक्तींची व्याख्याने, ग्रंथप्रदर्शने, कथाकथन, काव्यवाचन, माहितीपट, वक्तृत्व, लेखनस्पर्धा इत्यादी कार्यक्रमांचे आयोजन राज्यभर करण्याच्या अनुषंगाने तसेच मराठी भाषा विकासाचे अन्य नाविन्यपूर्ण उपक्रम सुरु करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्रमांक २, दि. १६.०१.२०१६ च्या शासन निर्णयान्वये मराठी भाषा विभाग (खुद्द) साठी स्वतंत्र लेखाशिर्ष मागणी क्र. झेडएफ ०१ अंतर्गत **“मराठी भाषा प्रचार व प्रसार कार्यक्रम (२०५२ ५२३२)”** निर्माण करण्यात आले आहे. तथापि, या लेखाशिर्षांतर्गत “५० इतर खर्च” या उद्दिष्टाखाली विभागास आवश्यक असणारी खर्चाची सर्व प्रयोजने नसल्याने मराठी भाषेच्या प्रचार-प्रसारासाठी खर्च करुनही या लेखाशिर्षामधून देयके अदा करणे शक्य होत नव्हते. यास्तव या लेखाशिर्षाखाली “५० इतर खर्च” या उद्दिष्टासह आणखी ११ उद्दिष्टे समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मराठी भाषेचा प्रचार व प्रसार करण्यासाठी मराठी भाषा संवर्धन पंधरवडा (दि. १ ते १५ जानेवारी), मराठी भाषा गौरव दिन (दि. २७ फेब्रुवारी), वाचन प्रेरणा दिन (दि. १५ ऑक्टोबर) तसेच भाषा अभ्यास/ संशोधन/ज्येष्ठ साहित्यिकांच्या स्मरणार्थ कार्यक्रमाचे आयोजन यासारखे कार्यक्रम भविष्यात राबविण्यासाठी मागणी क्र. झेडएफ ०१ अंतर्गत मराठी भाषा प्रचार व प्रसार कार्यक्रम (२०५२ ५२३२) या लेखाशिर्षाखाली “५० इतर खर्च" या उद्दिष्टासह पुढे नमुद केलेली आणखी ११ उद्दिष्टे समाविष्ट

करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सन २०१८-१९ पासून या लेखाशिर्षांतर्गत आर्थिक बाबी हाताळण्यासही मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक झेडएफ-०१<br>२०५२ सेक्रेटरिएट-सर्वसाधारण सेवा<br>०९०-सचिवालय,<br>(००)(०४) मराठी भाषा प्रचार व प्रसार कार्यक्रम, | Demand No. ZF- 01<br>2052 - Secretariat General Services<br>090 - Secretariat,<br>(00) (04) Publicity and Expansion Programme of Marathi Language. |
| ०५- बक्षिसे | 05 - Rewards |
| ०६ - दूरध्वनी, वीज व पाणी देयके | 06 - Telephone, Electricity and Water Charges |
| १० - कंत्राटी सेवा | 10 - Contractual Services |
| ११ - देशांतर्गत प्रवास | 11 - Domestic Travel Expenses |
| १२ - विदेश प्रवास खर्च | 12 - Foreign Travel Expenses |
| १६ - प्रकाशने | 16 - Publications |
| १७ - संगणकीकरणासाठी येणारा खर्च | 17 - Computer Expenses |
| २० - इतर प्रशासकीय खर्च | 20 - Other Administrative Expenses |
| २१ - सामग्री व पुरवठा | 21 - Supplies and Material |
| २६ - जाहिराती व प्रसिध्दी | 26 - Advertising and Publicity |
| २८ -व्यावसायिक व विशेष सेवा | 28 - Professional Services |
| ५० - इतर खर्च (योजनांतर्गत योजना) | 50 - Other Expenditure (Plan Scheme) |
| सांकेतांक (२०५२ ५२३२) | Head (2052 5232) |

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. युओआर-४३/१८/१४४३, दिनांक १६.०२.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौसं-१३३/२०१८/व्यय-४, दिनांक १६.०३.२०१८ तसेच प्रधान महालेखाकार कार्यालय, महाराष्ट्र-१ यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.ख.वि/चा-१/मराठी भाषा विभाग/ यूओआर-१२६/२०१५-१६/९०३, दिनांक १९.११.२०१५ अन्वये प्राप्त मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०५१४४५१५७७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajashri Uday Bapat

Digitally signed by Rajashri Uday Bapat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0abe21e41785319194707f89dc0e9ab5156282f4a89952d9774a26fade711538, cn=Rajashri Uday Bapat
Date: 2018.06.05 14:47:31 +05'30'

**( राजश्री बापट )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मुख्य सचिव/सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने),
६. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने),
७. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
१०.सर्व विभागीय आयुक्त,
११.सर्व जिल्हाधिकारी,
१२.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१३.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर,
१५.वरीष्ठ लेखा अधिकारी/टि.एम., प्रधान महालेखापाल कार्यालय, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-१,मुंबई
१६.वरीष्ठ लेखा अधिकारी/टि.एम., प्रधान महालेखापाल कार्यालय, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-२, नागपूर.
१७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१९.भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२०.सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई

२१.सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,

२२.प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,

२३.सहायक भाषा संचालक, विभागीय कार्यालय, नवी मुंबई/ पुणे/नागपूर/औरंगाबाद

२४.अवर सचिव, (१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

२५.अवर सचिव, (व्यय-४)/अर्थसंकल्प-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

२६.सर्व मंत्रालयीन विभाग

२७.सर्व कार्यासने, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई

२८. निवड नस्ती (भाषा - २).